**केंद्र शासनाच्या "कारागृह सुधारणा" या केंद्र पुरस्कृत (७५:२५) योजनेतर योजनेतील बांधकाम व इतर कामे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-२००२/प्र.क्र.१४७/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ११ जून, २००३.**

**वाचा:-** १) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे क्रमांक-१६०१३/५/२००१-जीपीए-रोमन चार, दिनांक २१ नोव्हेंबर,२००२ चे पत्र.

२) शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांक-एमआयएस-२००२/प्र.क्र.१४७/पीआरएस-२, दिनांक ९ डिसेंबर,२००२.

३) शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांक-एमआयएस-२००२/प्र.क्र.१४७/पीआरएस-२, दिनांक २६ मार्च,२००३.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने **"कारागृह सुधारणा"** ही योजनेतर योजना नव्याने सन २००२-०३ या वर्षापासून सुरु करीत असल्याचे कळविले असून सदर योजनेसाठी सन २००१ ते २००७ या ५ वर्षाकरिता राज्यास १) नवीन कारागृहाचे बांधकाम २) अस्तित्वात कारागृहांची दुरुस्ती व नूतनीकरण ३) स्वच्छता व पाणीपुरवठा व ४) कारागृह कर्मचाऱ्यांची निवासस्थाने इत्यादी संदर्भात सन २००२-०३ या आर्थिक वर्षासाठी तसेच सन २००२-०३ ते २००६-०७ या पाच वर्षाच्या कालावधीसाठी अंदाजित रु.१२९.१६ कोटीची योजना मंजूर केल्याचे कळविले असून यामध्ये राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु.३२.२८ कोटी इतका आहे.

२. केंद्र शासनाच्या उपरोक्त योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली वित्त सचिव,कारागृह महानिरीक्षक,अपर मुख्य सचिव (गृह) इ. सदस्य असलेल्या **कारागृह सुधारणा राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीची** स्थापना दिनांक ९ डिसेंबर २००२ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. समितीच्या निर्णयानुसार या योजनेच्या सन २००२-०३ या आर्थिक व सन २००२-०३ ते २००६-०७ या पाच वर्षाच्या कालावधीकरिता अनुक्रमे रु.२५.८३ कोटी व रु.१२९.१६ कोटी इतक्या रकमेच्या आराखड्यास विभागाच्या समक्रमांकित दिनांक २६ मार्च,२००३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

३. या योजनेतील बांधकाम व इतर बाबींसंबंधी कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून " ठेव अंशदान बांधकामे " (Deposit Contribution Works) पध्दतीने करण्यात येतील व याबाबतचे अनुदान नियंत्रक अधिका-यामार्फत संबंधित कार्यकारी अभियंता यांना वितरित करण्यात येईल. या योजनेवर होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "२०५६-तुरुंग,१०१-तुरुंग,केंद्र पुरस्कृत योजना, (००) (०१) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८-१) योजनेतर/दत्तमत" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात येऊन तो भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- प्र.क्र. ३१७ /०३ / व्यय-८ , दिनांक ५/३/२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(द्र.ना.माळी)
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव.
सर्व मंत्री महोदयांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.मुख्य सचिव.
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (गृह/तुरुंग/वित्त/नियोजन/सार्वजनिक बांधकाम)
सह सचिव (सी.एस.) गृह मंत्रालय,भारत सरकार,नॉर्थ ब्लॉक,नवी दिल्ली-११० ००१.
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक(मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर).
सर्व कारागृह अधिक्षक.
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता) ,मुंबई/नागपूर
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा) ,मुंबई/नागपूर.
अवर सचिव,कार्यासन बोयुडो-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (व्यय-८) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
निवडनस्ती.